# हॅरियेट टबमन

डेविड, चित्र: सॅम्युएल, मराठी : सुशील मेन्सन



# हॅरियेट टबमन

डेविड, चित्र: सॅम्युएल, मराठी: सुशील मेन्सन



हॅरियेट टबमनचा जन्म 1820 किंवा 1821 मध्ये अमेरिकेतील मेरीलँड राज्यातील डॉर्चेस्टर काउंटी प्रांतात असलेल्या एका मोठ्या फार्ममध्ये झाला. या फार्ममध्ये अनेक खोल्या आणि सुंदर फर्निचर असलेला एक मोठा बंगला होता. पण हॅरियेट या बंगल्यापासून दूर असलेल्या एका छोट्याशा झोपडीत जन्मली. या झोपडीला खिडकी नव्हती, झोपडीतील जमीन मातीची होती आणि आत बसण्यासाठी खुर्चीही नव्हती.



आपल्या मात्या-पित्यांच्या अकरा अपत्यांपैकी हॅरियेट सहावी होती. तिची आई हॅरियेट ग्रीन आणि पिता बेंजामिन रॉस हे गुलाम होते. त्यांचे मालक होते, एडवर्ड ब्रोडस. ते हॅरियेट टबमनचेही मालक होते.



गुलाम अहोरात्र कष्ट करत. पण त्यांना वेतन मिळत नसे. हॅरियेटला या गुलामीच्या आयुष्याचा तिटकारा होता. ती आपल्या मालकाचे आदेश जुमानत नसे. आपल्या मर्जीनुसार ती काम करत असे. त्यामुळे तिला मार मिळत असे.

एक दिवस हॅरियेट कुण्या दुसऱ्या मालकाकडे कामावर होती. तेथील घरी तिला एका कटोऱ्यात साखर दिसली. हॅरियेट म्हणते, “तोवर मी आयुष्यात कधी गोड-धोड चाखले नव्हते. मला ती साखर खाण्याची तीव्र इच्छा झाली.” तिने कटोऱ्यातून मूठभर साखर उचलली.





हॅरियेटची मालकीण मिस सुसनने तिला कटोऱ्यातील साखर खाताना पाहिले. हॅरियेटला मारण्यासाठी ती चाबूक घेऊन आली. हॅरियेट धूम पळाली आणि थेट डुकरांच्या शेडमध्ये जाऊन लपली. भूक लागल्यावर तिने तिथे कचऱ्यात फेकून दिलेल्या बटाट्यांच्या साली आणि खरकटं खाल्ले. काही वेळाने भूकेने बेजार झाल्यावर ती घरी परतली. मग मात्र मालकिणीने तिला चाबकाचे फटके दिले.



हॅरियेटचा मालक, एडवर्ड ब्रोडस, इमारती लाकूड, सफरचंद, गहू आणि मका विकत असे. हे सगळं त्याच्या शेतात उगवत असे. कधी-कधी तो स्वत:चे गुलाम दक्षिण भागातील मालकांना विकत असे. एक दिवस हॅरियेटने साखळदंडाने बांधलेल्या तिच्या दोन बहिणींनाही विकण्यासाठी नेत आहेत, हे पाहिले. आपल्यालासुद्धा कधीतरी विकतील, याचे तिला भय वाटू लागले.





हॅरियेट लहान असताना काही लोकांनी गुलामीच्या प्रथेविरुद्ध आवाज उठवण्यास सुरुवात केली होती. हे लोक "अबोलिशनिस्ट" म्हणून ओळखले जात. ते गुलामी प्रथेविरुद्ध मोर्चे काढत. "अबोलिशनिस्ट" स्वतःचे वर्तमानपत्रही छापत असत.



नॅट टर्नर एक तरूण गुलाम होता. इजिप्तमध्ये मोझेसने इस्रायली लोकांना गुलामीतून मुक्त केले, हे त्याने वाचले होते. नॅट टर्नरलाही आपल्या लोकांची गुलामीची बेडी तोडायची होती. 1831 साली त्याने बंड केले. त्यामध्ये गुलामांच्या मालकांच्या आणि त्यांच्या कुटुंबियांच्या हत्या करण्यात आल्या. यानंतर लगेच नॅट टर्नरला पकडून फासावर लटकावण्यात आले. हॅरियेटला वाटे, एक दिवस कुणी खराखुरा मोझेस अवतरेल आणि सर्वांना गुलामीच्या बंधनातून स्वतंत्र करेल.

1835 सालची गोष्ट. एक मालक आपल्या गुलामाला पकडण्यासाठी धावत होता. मालकाने गुलामावर लोखंडाचे एक वजन फेकले. चुकून ते हॅरियेटला लागले. हॅरियेट अक्षरश: मरता-मरता वाचली.





हॅरियेटच्या कपाळाला खोल जखम झाली. ही जखम कधी पूर्ण बरी झाली नाही. यामुळे पुढची ऐंशी वर्षे हॅरियेटला डोकेदुखीचा आणि निद्रानाशाचा त्रास जडला. देवाच्या कृपेने ती वाचली आणि दिर्घायुष्य जगली. या दुर्घटनेनंतर हॅरियेट नेमाने देवाची प्रार्थना करू लागली.



1844 साली हॅरियेटने जॉन टबमनशी लग्न केले. तो एक स्वतंत्र नागरिक होता. ते ब्रोडस फार्मच्या नजीक एका झोपडीत राहू लागले.

हॅरियेटने तिथून पळून जाण्याचे ठरवले. जॉननेही तिला सोबत करावी, अशी तिची इच्छा होती. पण जॉनला तिथेच राहायचे होते. जॉनने हॅरियेटला धमकावले की ती पळून गेली तर तो तिच्या मालकाला सांगेल. मग पोलीस आणि कुत्रे हॅरियेटचा पाठलाग करतील. तरीही हॅरियेटने पळून जाण्याचे ठरवले.

विचारपूर्वक तिने एक योजना बनवली.

शेतात काम करत असताना गुलाम नेहमी एक गीत गात असत. पळून जाण्याच्या एक दिवस अगोदर हॅरियेटने इतरांसोबत हे गीत गायले. गीताच्या शब्दांमध्ये इतर गुलामांसाठी मुक्तीचा संदेश लपला होता.

"मुक्तीचा रथ येईल

मला घेऊन जाईल

देवाच्या समृद्ध भूमीत"

हॅरियेट टबमनची "देवाची भूमी" उत्तर अमेरिकेत होती. तिथे गुलामीची प्रथा नष्ट झाली होती.



पुढल्या रात्री हॅरियेट आपल्या तीन भावांसोबत पळून गेली. त्यांच्याकडे पैसा-अडका, जेवण वगैरे नव्हते. कुठे जायचे हे माहित नव्हते. थोडे दूर गेल्यावर हॅरियेटच्या भावांचे मन बदलले आणि ते परतले. त्यांनी हॅरियेटलाही जबरदस्तीने सोबत परत आणले.

हॅरियेटने विचार केला, “मला मुक्त जगण्याचा किंवा मरण्याचा हक्क आहे. या दोनपैकी एक हक्क नाही मिळाला तरी दुसरा निश्चितच मिळेल.” दोन दिवसांनी हॅरियेट एकटीच पळून गेली.



हॅरियेट धावत-धावत एका गोऱ्या महिलेच्या घरी गेली. त्या महिलेने हॅरियेटला मदत करण्याचे वचन दिले होते. तिने हॅरियेटला दुसऱ्या सुरक्षित घराचा पत्ता आणि रस्ता सांगितला. तेथील लोकांनी तिला पुढच्या सुरक्षित घराचा पत्ता दिला. असं करत करत हॅरियेट एका सुरक्षित घरातून दुसऱ्या सुरक्षित घरात गेली. या प्रवासाला "अंडरग्राउंड रेलरोड" म्हणत असत. यात प्रत्येक रेलरोड किंवा स्टेशन अशा एका व्यक्तीचे घर होते ज्याला गुलामी प्रथा मान्य नव्हती. ते गुलामांना मुक्त होण्यासाठी मदत करत.



दिवसा हॅरियेट कुठेतरी लपत असे. रात्री ती प्रवास करत असे. शेवटी ती पेनिसिल्व्हानिया राज्यात पोहोचली. तिथे गुलामी प्रथेवर निर्बंध होते.


आता हॅरियेट स्वतंत्र होती. तिला जणू
पुनर्जन्मच झाल्यागत वाटले. ती लिहिते,
“आज वृक्षांआडून उगवलेला सूर्य मला सोन्याच्या
गोळ्यासारखा भासला. स्वर्गात आल्यासारखं वाटलं.”

1850 आणि 1860 दरम्यानच्या काळात हॅरियेट टबमनने स्वयंपाकाची, भांडी धुण्याची, घरांमध्ये केरकचरा काढण्याची कामे केली. तिने जे काही कमावले त्यातून दक्षिण अमेरिकेचे एकोणीस दौरे केले. यातून सुमारे तीनशेपेक्षा जास्त गुलामांना तिने मुक्त केले. यात तिचे स्वत:चेही अनेक नातलग होते.



हॅरियेट त्यांना एका सुरक्षित घरातून दुसऱ्या सुरक्षित घरात घेऊन जात असे. कित्येकदा ती गुलामांना कॅनडापर्यंत घेऊन जाई. हॅरियेट "अंडरग्राउंड रेलरोड" ची मार्गदर्शकच बनली.





कित्येकदा हॅरियेट वेष बदलून वृद्ध स्त्री किंवा पुरुष बनत असे. गीत गाऊन ती गुप्त संदेशांचा प्रचार करत असे. पलायन करणाऱ्या गुलामांचे लपलेल्या जागेतून बाहेर पडणे सुरक्षित होई तेव्हा ती आनंदाचे गीत गाई. हॅरियेटचा जड आणि घोगरा आवाज गुलामांना तात्काळ ओळखता येई.



हॅरियेटसोबत उत्तरेकडे जात असताना कुणी गुलाम परत मागे फिरणार नाही, याची ती काळजी घेत असे. गुलाम खूप घाबरलेले असत, पुढे जाण्यास कचरत. मग हॅरियेट त्यांच्या डोक्याला बंदूक टेकवून म्हणे, “ चालत राहा, नाहीतर फुकट मरशील.”

हॅरियेट अभिमानाने एकदा म्हणाली, “मी रेलगाडीला कधी रुळावरून घसरु दिले नाही, एकाही प्रवाशाला गमावले नाही.” या नव्या ‘मोझेस’ने आपल्या लोकांना गुलामीतून मुक्त केले. हॅरियेटला पकडून देणाऱ्यास गोरे सरकार मोठे इनाम देणार होती. पण तिला कधीच कुणी पकडू शकले नाही.





**1858 साली हॅरियेटची भेट जॉन ब्राऊनशी झाली. तेसुद्धा लोकांना गुलामीच्या बंधनातून मुक्त करण्यासाठी झटले होते. जॉन ब्राउनने हॅरियेट ही अमेरिकेच्या सर्वश्रेष्ठ आणि सर्वात शूर लोकांपैकी एक असल्याचे म्हटले. त्यांनी तिला “जनरल टबमन” असा** ख़िताब **दिला.**

1860 साली अब्राहम लिंकन अमेरिकेचे अध्यक्ष बनले. तेव्हा दक्षिणेतील अकरा राज्यांनी अमेरिकेशी संबंध तोडले. गुलामीच्या विरुद्ध बोलणाऱ्या लिंकनला ते आपला नेता मानण्यास तयार नव्हते.



12 एप्रिल 1861 रोजी उत्तर आणि दक्षिण अमेरिकेदरम्यान नागरी युद्ध सुरू झाले. त्यावेळी हॅरियेटने उत्तर अमेरिकेच्या सैन्यात नर्स आणि गुप्तहेर म्हणून काम केले. ती निडरपणे शत्रुंच्या गोटात जात असे. शेकडो गुलामांना तिने तिथून मुक्त केले. युद्धादरम्यान उत्तर अमेरिकेत पलायन करणाऱ्या अनेक गुलामांनाही तिने मदत केली.





डिसेंबर 1865 मध्ये नागरी युद्ध समाप्त झाले. त्यानंतर अमेरिकन घटनेमध्ये एक दुरुस्ती करण्यात आली. त्याद्वारे अमेरिकेतील गुलामी प्रथा संपूर्णपणे बंद झाली.



नागरी युद्ध संपल्यावर हॅरियेट टबमन न्यूयॉर्कमधील ऑबर्न शहरातील आपल्या घरी परतली. 1867 साली जॉन टबमनचे निधन झाले. 1869 साली हॅरियेटने पूर्वीचा गुलाम आणि नंतर उत्तर अमेरिकेच्या सैन्यात सैनिक असलेल्या नेल्सन डेव्हीसशी लग्न केले.

ऑबर्नमध्ये उदरनिर्वाहासाठी हॅरियेट घरोघरी जाऊन भाज्या विकत असे. जिथेजिथे ती जाई, लोक तिच्या "अंडरग्राउंड रेलरोड" बद्दल कुतूहलाने विचारत.

हॅरियेट तिच्या भेटीसाठी येणाऱ्या पूर्वीच्या गुलामांना सर्वतोपरी मदत करत असे. तिने स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळण्यासाठी चाललेल्या आंदोलनाचेही समर्थन केले. याच आंदोलनामुळे अमेरिकेत स्त्रियांना प्रथमच मतदानाचा हक्क मिळाला.





हॅरियेटने ऑबर्नमधील आजारी, गरीब आणि बेघर निग्रो लोकांसाठी एक आश्रम उघडला. 1911 साली ती स्वत: या आश्रमात राहू लागली. ती खूप वृद्ध आणि अशक्त झाली होती. ती म्हणत असे, “मला स्वर्गाचं बोलावणं ऐकू येतंय, तिथल्या देवदूतांचं गाणं ऐकू येतंय.”

10 मार्च 1913 रोजी हॅरियेट टबमनचे निधन झाले. त्यावेळी तिचे वय नव्वदपेक्षाही जास्त होते.




हॅरियेट टबमन अतिशय हिंमतवान आणि धाडसी स्त्री होती. लोकांकडून तिला भरपूर प्रेम आणि आपुलकी लाभली. ती मुक्तीच्या रेलगाडीची मार्गदर्शक होती आणि आपल्या लोकांची **“मोझेस”** सुद्धा.

## महत्वपूर्ण तारखा

| | |
|---|---|
| 1820 किंवा 1821 | डोर्चेस्टर काउंटी, मेरीलँड, अमेरिकेत जन्म. त्यांची नेमकी जन्मतारीख उपलब्ध नाही. |
| 1835 | जेव्हा ती एका गुलामाला पळून जाण्यास मदत करत होती तेव्हा तिच्या डोक्याला लोखंडी वजनामुळे जखम झाली. |
| 1844 | जॉन टबमनशी लग्न. 1867 मध्ये जॉनचे निधन. |
| 1849 | ब्रोडस फार्ममधून पेनिसिल्व्हानियाकडे पलायन. |
| 1862-1864 | उत्तर अमेरिकन सैन्यात नर्स आणि गुप्तहेराचे काम. |
| 1865 | अमेरिकन घटनेत तेरावी दुरुस्ती. यामुळे गुलामी प्रथा बेकायदेशीर ठरली. 6 डिसेंबर 1865 रोजीपासून हा कायदा अंमलात आला. |
| 1869 | नेल्सन डेव्हीसशी लग्न. 1888 मध्ये नेल्सनचे निधन. |
| 1908 | ऑबर्न, न्यूयॉर्कमध्ये गरीब निग्रो आणि वृद्ध लोकांसाठी आश्रमाची स्थापना. |
| 1913 | 10 मार्चमध्ये ऑबर्न, न्यूयॉर्क येथे निधन. |

**हॅरियेट टबमन** एक गुलाम म्हणून जन्मली. तिला गुलाम म्हणून जगण्याचा तिटकारा होता. त्यामुळे **“अंडरग्राउंड रेलरोड”** द्वारे पलायन करून तिने गुलामीतून मुक्ती मिळवली. **“अंडरग्राउंड रेलरोड”** द्वारे तिने 300 पेक्षा जास्त लोकांना गुलामीतून मुक्ती दिली. ही तिचीच स्फूर्तीदायक कहाणी आहे.

